**केंद्र पुरस्कृत योजनांचा आभासी स्वीय प्रपंजी खात्यामधील (Virtual PLA) शिल्लक/अखर्चित निधी IFMS प्रणाली मधून काढण्यास परवानगी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-बीजीएम १०.२१/(१८०/२१)/अर्थ-१**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- २३ डिसेंबर, २०२१

वाचा:-१) वित्त विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.९२/कोषा-प्रशा-५,दि.०२ मार्च २०२१.
२) भारत सरकार यांच्या वित्त मंत्रालयाचे कार्यालयीन ज्ञापन F.No.१(१३)/ PFMS/ FCD/ २०२०, दि.२३.०३.२०२१.
३) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३५/कोषा-प्रशा-४,दि.१ जुलै २०२१.
४) शासन निर्णय क्रमांक:-बीजीएम १०.२१/(११०/२१)/अर्थ-१, दि.१५ जुलै २०२१.
५) शासन निर्णय क्रमांक:-बीजीएम १०.२१/(११०/२१)/अर्थ-१, दि.५ ऑगस्ट २०२१.
६) शासन निर्णय क्रमांक:-बीजीएम १०.२१/(११०/२१)/अर्थ-१, दि.०७ ऑक्टोंबर २०२१

**प्रस्तावना:-**

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथे नमूद शासननिर्णयातील तरतुदीनुसार जलसंपदा विभागांतर्गत महामंडळाच्या निधी वितरण संनियंत्रणासाठी BEAMS प्रणालीवर आभासी स्वीय प्रपंजी लेखा(Virtual PLA) निर्माण करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार जलसंपदा विभागांतर्गत कार्यरत असलेल्या विविध पाटबंधारे विकास महामंडळांसाठी कोषागारात उघडण्यात आलेले स्वीय प्रपंजी लेखे BEAMS प्रणालीशी संलग्न करण्यात येतील. राज्य शासनाच्या अर्थसंकल्पाद्वारे प्राप्त होणारे भांडवली खर्चासाठीचे अनुदान महामंडळांकडून विद्यमान कार्यपद्धतीनुसार स्वीय प्रपंजी लेख्यात जमा करण्यात येईल. या स्वीय प्रपंजी लेख्याचे संनियंत्रण संबंधीत कोषागारामार्फत न होता BEAMS अंतर्गत विकसित केलेल्या आभासी स्वीय प्रपंजी लेखा प्रणाली (Virtual Personal Ledger Account System) द्वारे होईल अशी तरतूद करण्यात आली आहे.

त्यानुसार चालू आर्थिक वर्षामध्ये महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाला वितरीत केलेला निधी IFMS(Integrated Finanacial Management System) प्रणाली अंतर्गत प्रकल्पनिहाय उपलब्ध करून देण्यात येत आहे. तथापि, PFMS Cell, वित्त मंत्रालय, भारत सरकार यांचेकडून प्राप्त झालेल्या सूचनेनुसार दि.२५.१०.२०२१ रोजीच्या पत्रान्वये केंद्र पुरस्कृत योजनांसाठी वितरीत करण्यात आलेला व अखर्चित असलेला निधी Single Nodal Agency यांच्या बँक खात्यामध्ये जमा करणेबाबत महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाला कळविण्यात आले आहे. तसेच, आभासी स्वीय प्रपंजी लेख्यातून निधी आहरीत करण्यासाठी वित्त विभाग शासन निर्णय दि.०२.०३.२०२१ मधील परिशिष्ट ब मुद्दा क्रमांक ३ व ४ नुसार अडचण निर्माण होत असल्याने सदर

मुद्यामध्ये दुरुस्ती किंवा सुधारणा करून विशेष बाब म्हणून आभासी स्वीय प्रपंजी लेखामधून निधी आहरीत करण्यासाठी परवानगी देण्याची विनंती महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाने केली आहे. या संदर्भात शासनाने आता पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

वित्त विभागाच्या दि.२ मार्च २०२१ रोजीच्या शासन निर्णयातील परि.२ अन्वये स्वीय प्रपंजी लेखा खात्यातून रक्कम अदा करण्यासाठी धनादेशाचा वापर पूर्णपणे बंद करण्यात आलेला आहे. महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाने मागणी केल्याप्रमाणे आभासी स्वीय प्रपंजी लेखा खात्यातून सदर निधी SNA बँक खात्यात वर्ग करावयचा झाल्यास पूर्वीच्या कार्यपद्धतीनुसार धनादेशाचा वापर करावा लागणार आहे. तरी **"एका वेळची विशेष बाब"** म्हणून महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाकडील आभासी स्वीय प्रपंजी लेखा खात्यातील अखर्चित निधी SNA बँक खात्यात वर्ग करण्यास्तव केवळ **"एकदाच"** धनादेशाचा वापर करण्यास परवानगी देण्यात येत आहे.

२. **त्याप्रमाणे महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ यांनी कोषागारातून धनादेश पुस्तक प्राप्त करून घ्यावे व सदरचा एक व्यवहार पूर्ण झाल्यानंतर उर्वरित धनादेश पुन्हा कोषागारात जमा करावेत**. ३ केंद्र पुरस्कृत योजनांच्या अनुषंगाने योजनानिहाय SNA बँक खात्याची परिपूर्ण माहिती यापूर्वीच महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाला उपलब्ध करून दिली आहे. त्यानुसार शिल्लक/अखर्चित असलेला निधी SNA यांच्या योजनानिहाय बँक खात्यामध्ये जमा करणे आवश्यक राहील. योजनानिहाय बँक खात्यामध्ये जमा केलेल्या रकमेबाबत प्रकल्पनिहाय गोषवारा देखील महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाने शासनास तात्काळ उपलब्ध करून देणे आवश्यक राहील.

३. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२०२१/२३१/कोषा/ प्रशा-५, दि.०९.१२.२०२१ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२२३१७०७५९८२२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SATISH KARBHARI JONDHALE
Date: 2021.12.23 17:08:50 +05'30'

**( सतिश जोंधळे )**

**आंतरवित्तीय सल्लागार व सहसचिव**

**प्रत:-**

१) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर

२) महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर

३) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

४) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

५) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे

६) उपसचिव, (निवसं/लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

७) Asst.State Nodal Officer, State Directorate, PFMS, Maharashtra.

८) वित्त विभाग (व्यय-१२/अर्थ-१०/अर्थ-४/अर्थोपाय/साउ/अर्थबळ/कोषा-प्रशा-५), मंत्रालय, मुंबई

९) नियोजन विभाग (कार्यासन १४३३) मंत्रालय, मुंबई,

१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

११) अर्थ-१/२ कार्यासन संग्रहार्थ.